औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे Aeronautical Structure and Equipment Fitter हया व्यवसाय अभ्यासक्रमाच्या ०३ तुकडयांकरीता ०३ शिल्पनिदेशकांची पदे व सदर अभ्यासक्रमांना शासनाचे अनुज्ञेय शुल्क आकारण्यास परवानगी देणेबाबत

महाराष्ट्र शासन
कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
शासन निर्णय क्रमांक : आयटीआय- २०१९/प्र.क्र.१३८/व्यशि-३
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०२१

वाचा : १) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ३३१५/प्र.क्र.१७/व्यशि३
- दिनांक १४.०५.२०१५
२) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: आयटीआय-२०११/प्र.क्र.३७/व्यशि-३ (भाग-३) दिनांक: २६.०२.२०१४
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक: आयटीआय २०१९/प्र.क्र.१३८/व्यशि-३ दिनांक २०.०९.२०१९

**प्रस्तावना :**

देशात जागतिक प्रशिक्षण आणि शैक्षणिक उपक्रम विकसित करण्यासाठी कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालय, भारत सरकार व Dassault Skill Academy, France यांच्या दरम्यान दि.०३ जुलै, २०१९ रोजी सामंजस्य करार करण्यात आला. सदर करारानुसार औद्योगिक प्रशिक्षण संस्था नागपूर येथे ऑगस्ट २०१९ या प्रवेशसत्रापासून Aeronautical Structure and Equipment Fitter ह्या व्यवसाय अभ्यासक्रमांच्या ३ तुकड्या सुरू करण्यासाठी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशिक्षण हे ३ वर्षाकरीता स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशिक्षणाकरीता पहिल्या ३ वर्षाकरीता Dessault Aviation, France यांच्यामार्फत ३ तज्ञ प्रशिक्षक उपलब्ध करुन देण्यात आलेले होते.

Dessault Aviation, France या आस्थापनेमार्फत Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमाचा स्वयंअर्थसहाय्यित प्रशिक्षण राबविण्याचा ३ वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने, सदर अभ्यासक्रम शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था नागपूर, या संस्थेमार्फत प्रशिक्षण राबविणे व अभ्यासक्रमाकरीता ३ शिल्पनिदेशकांची पदे मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या कौशल्य विकास व उद्योजकता मंत्रालयाने केलेल्या सामंजस्य करारानुसार Dassault Aviation, France यांच्या सहकार्याने शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेत Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमांच्या ३ तुकडया सुरू करण्यास या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

१. औद्योगिक प्रशिक्षण संस्थ, नागपूर येथे Aeronautical Structure and Equipment Fitter ह्या व्यवसाय अभ्यासक्रमांच्या ०३ तुकड्या करीता प्रत्येक तुकडीस १ या प्रमाणे ०३ शिल्पनिदेशकांची पदे मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर अभ्यासक्रमाकरीता डी.जी.टी. नवी दिल्ली यांच्या मानकानुसार ०३ तुकड्यांकरीता आवश्यक मनुष्यबळ औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने अतिरेकी कारवाईग्रस्त जिल्हयातील युवकांसाठी कौशल्य विकास कार्यक्रमांतर्गत गडचिरोली व गोंदिया येथे कौशल्य विकास केंद्रे सुरु करण्यासाठी संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या एकुण ४८ पदांपैकी शिल्पनिदेशकांची एकुण ०३ पदे Aeronautical Structure and Equipment Fitter या अभ्यासक्रमाकरीता वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार Dessault Aviation, France या आस्थापनेमार्फत Aeronautical Structure and Equipment Fitter या व्यवसाय अभ्यासक्रमाचा स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर अभ्यासक्रम राबविण्याचा ३ वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरीता शासकीय औ.प्र. संस्था नागपूर या संस्थेस नियमानुसार अनुज्ञेय असलेले नियमित प्रशिक्षण शुल्क आकारून अभ्यासक्रम राबविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११३०११५०१०९३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2021.11.30 11:52:08 +05'30'

**( विनोद बोंदरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव ,कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय,मुंबई
३. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
५. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत ) निवड नस्ती. (व्यशि-३).